**उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नवी मुंबई येथील नवीन इमारतीमध्ये विद्युत संच मांडणीचे कामासह अग्निशमन व अग्निसुचक यंत्रणा बसविणे इ. खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- पकाबा १२१३/प्र.क्र.४०६/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २५ जुलै, २०२३

**वाचा :-**

१) गृह विभाग शासन निर्णय समक्रमांक दि.०७.११.२०१६.
२) परिवहन आयुक्त महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र- काईबां(४३)/न.क्र.१४/का-१०(१)/२०२२/जा.क्र.३१५६, दि.०३.०३.२०२३ व जा.क्र.३६९४, दि.२३.०३.२०२३.
३) उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नवी मुंबई यांचे पत्र क्र. उप प्रापका/नवी मुंबई/आस्था/२०२३/जा.क्र.११५५, दि.०८.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नवी मुंबई या कार्यालयाच्या इमारतीमध्ये विद्युत संच मांडणीचे कामासह अग्निशमन व अग्निसुचक यंत्रणा बसविणेच्या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नवी मुंबई या कार्यालयाच्या इमारतीमध्ये विद्युत संच मांडणीचे कामासह अग्निशमन व अग्निसुचक यंत्रणा बसविणेसाठीच्या एकूण रु.६४,९७,८१७/- (अक्षरी रुपये चौसष्ठ लाख सत्त्यान्नव हजार आठशे सतरा फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील बाबींची पूर्तता करण्याच्या अटीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

i. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
ii. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही - २०१३ /प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

iii. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च गृह (परिवहन) विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात येईल.

iv. नियोजित जागा ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

v. सदर कामाची ई-निविदा करताना कामाचे तुकडे न करता एकत्रित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

vi. सदरहू प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने आवश्क निधीची तरतूद स्वतंत्रपणे करण्यात येईल.

२. सदरील अंदाजपत्रकाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | रक्कम (रु.) |
|---|---|---|
| १ | NMESD/OW/७८९ of २०२२-२०२३ Providing Fire Fighting and Fire Hydrant System Arrangement at RTO Building at Nerul, Tal.Thane | ६४९७८१७.०० |
| | Total | ६४९७८१७.०० |

एकूण रु. ६४,९७,८१७/- (अक्षरी रुपये चौसष्ठ लाख सत्त्यान्नव हजार आठशे सतरा फक्त)

३. यासाठी येणारा खर्च “मागणी क्र. एच-८, (०८) परिवहन (०८) (०१) मोठी बांधकामे (योजनांतर्गत) (४०५९०८२३) -५३ मोठी बांधकामे” अंतर्गत चालु वित्तीय वर्षामध्ये मंजूर निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत परिच्छेदाखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारमधील परिच्छेद क्र.१३४(१),१३४(२) आणि १३४(३) मधील वित्तीय अधिकारांच्या वित्तीय मर्यादा व अटीमध्ये सुधारणा करण्याबाबतचा वित्त विभाग, शासन निर्णय दि.२०.०९.२०१९ मधील अ.क्र.१,परिच्छेद क्र. १३४(२) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७२५१५३५५१७४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI
BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.07.25 15:37:23 +05'30'

**( भरत लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
४. प्रधान सचिव,गृह (परिवहन) विभाग,मंत्रालय यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती (परि-४)